**लवाद धोरणानुसार लवाद संस्थांना**
**मान्यता देण्याची कार्यपध्दती...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण - २०१६ / प्र. क्र. २०/ का - १९.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०१ डिसेंबर, २०१६

<u>वाचा</u> : शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०१६ / प्र. क्र. २०/ का - १९, दिनांक १३ ऑक्टोबर २०१६.

<u>प्रस्तावना :</u>

वर नमुद शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र राज्यास "संस्थात्मक लवाद धोरण " लागू करून सदर धोरण निर्गमित करण्यात आले आहे. सदर धोरणाच्या अनुषंगाने लवाद संस्थांना मान्यता देण्याबाबतची कार्यपध्दती ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

आता लवाद संस्थांना मान्यता देण्याबाबतची कार्यपध्दती खालीलप्रमाणे अवलंबण्यास शासन मंजुरी देत आहे :

अ) विधि व न्याय विभागास याद्वारे लवाद संस्थाना मान्यता देण्याच्या तसेच मान्यता काढून घेण्याच्या प्रकरणांवर / प्रस्तावांवर कार्यवाही करणारा प्रशासकीय विभाग म्हणून सूचित करण्यात येत आहे .

ब) संस्थात्मक लवाद धोरणांतर्गत, विशेषतः संदर्भित शासन निर्णयातील खंड सात, आठ, नऊ व अकरा मधील निकष पूर्ण करणाऱ्या संस्थांनी आवश्यक त्या कागदपत्रांसहित शासनाकडे अर्ज केल्यास त्यावर विधि व न्याय विभागाकडून कार्यवाही करण्यात येईल.

क) संस्थांनी केलेल्या अर्जांमध्ये गुणवत्तेची, विहित निकषांची तसेच पायाभूत सुविधा ह्या बाबींची पूर्तता होत आहे किंवा कसे याची छाननी करण्यासाठी व त्यानुसार संस्थेस मान्यता देण्याची शिफारस शासनास करण्यासाठी सचिवांची एक समिती गठीत करण्यात येत आहे.

ड) समितीची रचना खालीलप्रमाणे असेल : -

| | |
|---|---|
| १) मा. मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २) अतिरिक्त मुख्य सचिव/ प्रधान सचिव (वित्त) | सदस्य |
| ३) प्रधान सचिव व विधि परामर्शी | सदस्य |
| ४) सह सचिव / उप सचिव , विधि व न्याय विभाग, कार्यासन १९चे प्रभारी अधिकारी | सदस्य सचिव |

ई) उपरोक्त समिती प्राप्त अर्जाचे लवाद धोरणाच्या अनुषंगाने मूल्यमापन करेल व संस्थेस मान्यता देण्याबाबतची योग्य ती शिफारस शासनाकडे करेल.

फ) उपरोक्त समितीच्या शिफारशीच्या आधारे प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग हे प्रस्ताव मान्यतेसाठी मा. मंत्री (विधि) व मा. मंत्री (वित्त ) यांचे मार्फत मा. मुख्यमंत्री महोदयांकडे सादर करतील.

ग) संस्थांची मान्यता काढून घेण्याची प्रकरणे देखील प्रथम उपरोल्लेखित सचिव समितीकडून लवाद धोरणाच्या खंड १३ च्या अनुषंगाने विचारात घेऊन तदनंतर शासन मान्यतेसाठी वर नमूद पद्धतीचा अवलंब करून सादर केली जातील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१६१२०११६५२२११४१२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra D Sawant

Digitally signed by Rajendra D Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6c5df198d588de75e335db20487f4df45c73eca4ce5875cd77fd8b1924a3fdf8, cn=Rajendra D Sawant
Date: 2016.12.01 16:54:10 +05'30'

( राजेंद्र सावंत )
विधि सल्लागार-नि-सहसचिव

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव
२. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
३. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
४. मुख्य सचिव , महाराष्ट्र राज्य मुंबई
५. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग
६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७. सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय , मुंबई
८. सर्व जिल्हाधिकारी
९. अध्यक्ष विधानसभा, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय , मुंबई
१०. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय , मुंबई
११. विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय , मुंबई
१२. महाप्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई
१३. महाधिवक्ता महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे स्वीय सहायक
१४. सरकारी वकील, उच्च न्यायालय, अपील शाखा, रिट सेल मुंबई
१५. सरकारी वकील, उच्च न्यायालय, अपील शाखा,मुंबई
१६. सरकारी वकील, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
१७. निवडनस्ती.